प्रादेशिक मनोरुग्णालय, नागपूर येथील वॉर्ड फॅमिली युनीट क्र.४ ची व वॉर्ड नं.९,१० (पुरुष) १७(महिला) ची दुरुस्ती व उन्नतीकरणाच्या अंदाजपत्रक व आराखडयांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१७/ प्रक्र-५५/आरोग्य ३(अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला,
एल.टी.मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: १२ जुलै, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः पी.एच.डी. ३००१/ प्रक्र-३६६/२०१६/आ-७ दिनांक-३०.०८.२०१६

२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचा प्रस्ताव क्र. संआसे /मा.आ/टे-१/टाटा ट्रस्ट. साम. करार. वार्ड दु.नाग/२०१-२०४/ १७, दिनांक-२७.१.२०१७

प्रस्तावना:-

संदर्भाधीन क्र. २ च्या पत्रान्वये प्रादेशिक मनोरुग्णालय , नागपूर येथील वॉर्डची व फॅमिली युनीट क्र.४ , वॉर्ड नं ९, १० (पुरुष ) व वॉर्ड नं. १७ (महिला) ची दुरुस्ती व उन्नतीकरण करण्याच्या बांधकामासाठीचे रु.७५,६७,६०० /- (रु. पंचाहत्तर लाख सदुसष्ट हजार सहाशे फक्त ) इतक्या किमतीच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता व अनुदान उपलब्धतेसाठीचा प्रस्ताव आरोग्य सेवा संचालनालयाव्दारे शासनास सादर केला आहे. सदर अंदाजपत्रक व आराखडयांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

आता या शासन निर्णयान्वये प्रादेशिक मनोरुग्णालय , नागपूर येथील वॉर्डची व फॅमिली युनीट क्र.४ वॉर्ड नं ९, १० (पुरुष ) व वॉर्ड नं. १७ (महिला) ची दुरुस्ती व उन्नतीकरण करण्याच्या बांधकामासाठीचे रु.७५,०६,५८० /- (रु. पंचाहत्तर लाख सहा हजार पाचशे ऐंशी फक्त ) इतक्या किमतीच्या अंदाजपत्रक व आराखडयास खालील अटीं व शर्तीच्या अधिन राहुन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे

कामाचा वाव खालीलप्रमाणे आहे.

| A) Estimate for Proposed Renovation and Up gradation work of Family Block 4 Units | |
|---|---|
| cost of repairs single family Blocks Total no Blocks 4 Units (each Rs.613000.00) | Rs.2452,000.00 |
| add for 15% Mental Hospital CSR Charges | Rs.367800.00 |
| add 4% for contingencies | Rs.98080.00 |
| add for Landscaping 10% | Rs.245200.00 |
| Total | Rs.3163080.00 |

| B) Estimate for Proposed Renovation and Up gradation work of Ward no.9 & 10 (Male) | |
|---|---|
| cost of repairs ward no 9&10 (Male | Rs.2375000.00 |
| add for 15% Mental Hospital CSR Charges | Rs.356250.00 |
| add 4% for contingencies | Rs.95000.00 |
| Total | Rs.2826250.00 |

| C) Estimate for Proposed Renovation and Up gradation work of Ward no.17 (Female) | |
|---|---|
| cost of repairs ward no 17 (Female) | Rs.1275000.00 |
| add for 15% Mental Hospital CSR Charges | Rs.191250.00 |
| add 4% for contingencies | Rs.51000.00 |
| Total | Rs.1517250.00 |
| **Grand Total A+B+C** | **RS.7506580/-** |

## अटी व शर्ती

अ) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सा.बां.विभागाचे संबंधित मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकित करुन घ्यावे.

ब) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

क) कामासाठीच्या जागेची उपलब्धता,योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री आरोग्य संस्था प्रमुख यांनी करावी.

ड) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्टया मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या त्या क्षेत्राच्या सक्षम अधिका-यांकडून करण्यात यावी. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उपसंचालकाच्या सहमतीने तरतुदी अंतीम करण्यात याव्यात.

इ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग,शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१,दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

ई) सदरचा खर्च सार्वजनिक आरोग्य विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या निधीतून भागवावा.

सदर बांधकामावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा .

**<u>लेखाशिर्ष</u>:-**

२२१०- वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०१- नागरी आरोग्य सेवा (विषमचिकीत्सा)
११० - रुग्णालये व दवाखाने
११०-६- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना
(०६) (०१)- मध्यवर्ती रुग्णालये
२७- लहान बांधकामे **(२२१० ०२९१)**

हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौप २८४/ इमा -२, दि.१५/०३/२०१७ अन्वये प्राप्त सहमतीने तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय- विअप्र २०१३ /प्र.क्र. ३०/ २०१३ विनीयम भाग-२ दि. १७/०४/२०१५ सोबतच्या परिशीष्ट भाग - पहिला उपविभाग - पाच मधील अनुक्रमांक -१ परिच्छेद क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१७०७१११७०३३१००१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ROSHANI DINESH KADAM PATIL

Digitally signed by ROSHANI DINESH KADAM PATIL
DN: cn=ROSHANI DINESH KADAM PATIL, o, ou, email=roshani.patil@nic.in, c=US
Date: 2017.07.12 11:53:29 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) आयुक्त,आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई
२) संचालक ,आरोग्य सेवा, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य संस्थांमार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम) आरोग्य सेवा,मुंबई.
४) उपसंचालक , आरोग्य सेवा, नागपूर मंडळ,नागपूर.
५) कार्यकारी अभियंता ( IDW), राष्ट्रीय आरोग्य मिशन, नागपूर.
६) वैद्यकीय अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय, नागपूर
७) मुख्य अभियंता ,सा.बां.प्रादेशिक विभाग,मुंबई
८) महालेखापाल-१/२ महाराष्ट्र (लेखा व लेखापरिक्षा )/(लेखा व अनुज्ञेयता)मुंबई/नागपूर
९) वित्त विभाग (विनीयम कार्यासन/कोषा-५/अर्थसंकल्प) मुंबई
१०) अवर सचिव (अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
११) निवडनस्ती